**मैत्री कक्षात Ease of Doing Buisness (EoDB) अंतर्गत Maitri Grievances Management System प्रणाली विकसीत करण्यासाठी मे.महाऑनलाईन लि. याना एकूण रु.१०,७१,६७५/- (सर्व करांसहित)इतके मानधन एकरकमी अदा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय, क्र.मेइम-२०२०/प्र.क्र. ०५ (म.ऑ.दे.) /उद्योग-८,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक - ०३ फेब्रुवारी, २०२०**

<u>वाचा</u>:- १) शासन निर्णय क्र.इ बीज-२०१३/ प्र.क्र.११७/ उद्योग-८ दिनांक १/३/२०१४
२) शासन निर्णय क्र. मेइम-२०१५/ प्र.क्र.१०५ / उद्योग-८ दिनांक ११/२/२०१६
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. पूरक -२०१६/प्र.क्र.१२८/अर्थसंकल्प-३, दिनांक १२/८/२०१६.
४) उद्योग संचालनालयाचे कार्यादेश दिनांक ११ /१० /२०१९
५) उद्योग संचालनालयाचे पत्र क्र. उ.सं./ मैत्री -॥ /महाऑनलाईन-मैत्री पोर्टल/देयक/२०१९/ अे-१६२९, दि. १८/१२/२०१९

**<u>प्रस्तावना:-</u>**

राज्याच्या औद्योगिक धोरणास अनुसरुन गुंतवणुकदारांना सहाय्य करण्यासाठी शासनाने दि.२७.२.२०१४ पासून मुंबई येथे एकात्मिक सुलभता कक्ष (Integrated Facilitation Center) महाराष्ट्र उद्योग,व्यापार आणि गुंतवणुक सुविधा केंद्र (मैत्री) स्थापित केला आहे. सदर मैत्री कक्षामार्फत एक खिडकी संकल्पनेतंर्गत गुंतवणुकदारांना सर्व सेवा, माहिती व मार्गदर्शन एकाच ठिकाणी उपलब्ध करुन देण्यात येते. जेणेकरुन राज्याचा सुलभ व समतोल औद्योगिक विकास होऊन अधिकाधिक गुंतवणुक राज्यात आकर्षित होईल. सन २०१९-२० या अर्थसंकल्पीय वर्षात प्रस्तुत मैत्री कक्षासाठी रु.१३.५० कोटीची तरतुद करण्यात आलेली आहे. मैत्री कक्षाचे काम पार पाडण्यासाठी शासन निर्णय दि.११.२.२०१६ अन्वये एकूण ४१ पदांची निर्मिती करण्यात आलेली आहे. राज्यात येणाऱ्या उद्योग उभारणीसाठी आवश्यक सर्व परवानग्या सिंगल विंडो मार्फत एकाच ठिकाणी उद्योजकांना उपलब्ध करुन देण्याचे उदिष्ट समोर ठेवून शासनाने महाऑनलाईन या संस्थेच्या मार्फत मैत्रीचे पोर्टल विकसित केले आहे. सदर मैत्री पोर्टलच्या कामकाजाचा अतिरिक्त भाग म्हणून Ease of Doing Buisness (EoDB) अंतर्गत Maitri Grievances Management System प्रणाली विकसीत करण्यासाठी मे.महाऑनलाईन लि. याना एकूण रु.१०,७१,६७५/-(सर्व करांसहित) इतके मानधन उद्योग संचालनालयाच्या दि.०२ ऑगस्ट,२०१७ च्या पत्रान्वये निश्चित करण्यात आलेले आहे. सदर Maitri Grievances Management System प्रणाली विकसीत करण्यासाठी झालेला खर्च रु.१०,७१,६७५/- एकरकमी मे. महाऑनलाईन यांना अदा करण्याबाबत उद्योग संचालनालयाने संदर्भाधीन क्र. ५ अन्वये सादर केलेल्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

मैत्री कक्षाच्या पोर्टलवर Maitri Grievances Management System प्रणाली विकसीत करण्यासाठी मे.महाऑन लाईन लि. या संस्थेस एकूण रु.१०,७१,६७५/- (सर्व करांसहित) अदा करण्याबाबत उद्योग संचालनालयाकडून सादर करण्यात आलेल्या प्रस्तावास तसेच त्यानुषंगाने झालेला खर्च रु.१०,७१,६७५/- (अक्षरी रुपये दहा लक्ष एकाहत्तर हजार सहाशे पंचाहत्तर फक्त) इतका खर्च मे. महाऑनलाईन या संस्थेस एकरकमी अदा करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर मागणीपोटी होणारा खर्च "मागणी क्र. के-७, मुख्य लेखाशीर्ष-२८५२, उद्योग, ८०, सर्वसाधारण, १०२ औद्योगिक उत्पादकता, **२८-व्यावसायिक सेवा** (योजनांतर्गत) २८५२ ए ०२२ ) " या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षातील मंजूर केलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. सदरची तरतूद आहरित करण्यासाठी लेखाधिकारी, उद्योग संचालनालय, मुबई यांना आहरण व संवितरण अधिकारी व अतिरिक्त विकास आयुक्त (उद्योग) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर निधीच्या विनियोगाबाबत तसेच महालेखापाल यांच्या लेख्याशी खर्च ताळमेळ घालण्याची कार्यवाही करावी. सदर निधी प्रत्यक्षात वितरित झाल्यानंतर खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल यांना पाठवून त्याची प्रत शासनास सादर करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकाऱ्याची राहील.

४. प्रस्तुत प्रयोजनार्थ झालेल्या खर्चाचे देयक अदा करण्याबाबत अतिरिक्त उद्योग संचालक, उद्योग संचालनालय, मुंबई यांनी यापूर्वी निर्गमित केलेला कार्यादेश क्र.उसं/मैत्री-II/महाऑनलाईन-मैत्री पोर्टल/ देयक/ २०१९/बी.१८२३३, दि. दि.११.१०.२०१९ रद्द करण्याच्या अटीवर सदर प्रस्ताव मंजूर करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय शासन आदेश वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२ दिनांक १७/४/२०१५ अन्वये सुधारित केलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उप विभाग २ मधील अनुक्रमांक -२७ अ नियम क्र. ७६ अनुसार प्रशासकिय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२००२०४१२००२३२३१० असा आहे. हा आदेश डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नावाने,**

Anilkumar R Ugale

Digitally signed by Anilkumar R Ugale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1d265dc74c98f72f41f5a1403db16525e09e7de2e336c36 6de3a32ea2a050a8a, cn=Anilkumar R Ugale
Date: 2020.02.04 12:03:30 +05'30'

**( अनिलकुमार रा. उगले )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. विकास आयुक्त ( उद्योग ), उद्योग संचालनालय, मुंबई-३२.
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, (MIDC) मुंबई
३. मे. महाऑनलाईन लिमिटेड, १० वा मजला, बी विंग, गोदरेज कोलेसियम, सायन (पूर्व), मुंबई
४. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा ), महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर.
५. संचालक, लेखा व कोषागारे, संगणक शाखा, नवीन प्रशासन भवन, मुंबई-३२.
६. सहायक संचालक, (वित्त व लेखा), उद्योग संचालनालय, मुंबई.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई, /निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
८. उपसचिव ( प्रशासन), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-७ / अर्थसंकल्प-३), मंत्रालय, मुंबई-३२.
१०. कक्ष अधिकारी, प्रशासन-१, उ.ऊ. व का.वि., मंत्रालय, मुंबई-३२.
११. निवड नस्ती ( उद्योग-८).